**मा.सर्वोच्च न्यायालयाच्या निदेशानुसार मा.न्या.श्री.पी.व्ही रेड्डी यांच्या अध्यक्षतेखाली गठित दूसरा राष्ट्रीय न्यायिक वेतन आयोगाने केलेल्या अंतरिम शिफारशी राज्यातील दुय्यम न्यायालयातील न्यायिक अधिकाऱ्यांना/ निवृत्तीवेतन व कुटुंब निवृत्तीवेतनधारकांना दि.०१.०१.२०१६ पासून लागू करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग**
**शासन निर्णय क्र. एचसीटी-१११८/प्र.क्र.३०/का.३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ३२
दि. २१ जून, २०१८.

पहा :- १) शासन निर्णय क्र.एचसीटी-३००३/(६२)/का.तीन, दि.०४.०७.२००३. (वेतन)
२) शासन निर्णय क्र.एचसीटी-२००३/(१३८)/का.तीन, दि.२३.०७.२००४.(भत्ते)
३) शासन निर्णय क्र.एचसीटी-२००९/प्र.क्र.१४१/का.तीन, दि.२२.१०.२०१०.(वेतन)
४) शासन निर्णय क्र.एचसीटी-२००९/प्र.क्र.१४१/का.तीन, दि.२२.१०.२०१०.(भत्ते)
५) मा. सर्वोच्च न्यायालयाचे रिट याचिका क्र.६४३/२०१५ , दि.२७.०३.२०१८ चे आदेश.

**प्रस्तावना :-**

मा.सर्वोच्च न्यायालयाच्या निदेशानुसार केंद्र शासनाने राज्य तसेच केंद्रशासित प्रदेशातील न्यायिक अधिकाऱ्यांच्या वेतन संरचना व भत्ते तसेच सेवानिवृत्ती वेतन व सेवानिवत्तीनंतरचे इतर लाभ , इतर अनुषंगिक बाबींचा अभ्यास करुन शिफारशी करण्यासाठी दुसरा राष्ट्रीय न्यायिक वेतन आयोग स्थापन केला आहे. दूसरा राष्ट्रीय न्यायिक वेतन आयोगाने (मा.न्या.रेड्डी आयोग) दि.०९.०३.२०१८ रोजी अंतरिम वेतन अहवाल मा.सर्वोच्च न्यायालयामध्ये सादर केला.

मा.सर्वोच्च न्यायालयाने रिट याचिका (सिव्हिल)क्र. ६४३/२०१५ या न्यायालयीन प्रकरणांमध्ये दि.२७.०३.२०१८ च्या आदेशान्वये मा.न्या.श्री.पी.व्ही.रेड्डी यांच्या अध्यक्षतेखाली गठित दूसरा राष्ट्रीय न्यायिक वेतन आयोगाने केलेल्या अंतरिम शिफारशी न्यायिक अधिकाऱ्यांना/ निवृत्तीवेतन व कुटुंबनिवृत्ती वेतन धारकांना लागू करण्याबाबत राज्य शासनास आदेशित केले आहे. तसेच मा.सर्वोच्च न्यायालयाने न्यायिक अधिकाऱ्यांच्या मूळ वेतनामध्ये ३०% वाढीव वेतन हे दि.०१.०५.२०१८ पासून व त्याबाबतची थकबाकी ही दि.३०.०६.२०१८ पर्यंत देण्याबाबतही आदेशित केले आहे. त्यानुषंगाने राज्यातील दुय्यम न्यायालयातील न्यायिक अधिकाऱ्यांना दूसरा राष्ट्रीय न्यायिक वेतन आयोगाच्या अंतरिम शिफारशी लागू करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती :-

**शासन निर्णय :-**

मा.सर्वोच्च न्यायालयाने दि.२७.०३.२०१८ रोजी दिलेल्या आदेशानुसार राज्यातील दुय्यम न्यायालयातील न्यायिक अधिकाऱ्यांना, निवृत्तीवेतनधारक न्यायिक अधिकाऱ्यांना व कुटुंब निवृत्तीवेतनधारकांना दूसरा राष्ट्रीय न्यायिक वेतन आयोगाच्या अंतरिम शिफारशी दि.०१.०१.२०१६ पासून लागू करण्यास शासन पुढीलप्रमाणे मंजूरी देत आहे :-

१) राज्यातील दुय्यम न्यायालयातील सर्व संवर्गातील न्यायिक अधिकाऱ्यांना दि.०१.०१.२०१६ पासून मूळ वेतनामध्ये ३०% वाढ देऊन नियमित वेतनवाढीसह अंतरिम वेतनवाढ देण्याची अंमलबजावणी दि.०१.०५.२०१८ पासून करण्यात यावी.

२) सदर वेतनवाढ ही स्वतंत्र गृहीत धरण्यात यावी. त्यावर कोणताही महागाई भत्ता अनुज्ञेय असणार नाही.

३) थकबाकीची रक्कम खाली नमूद केल्याप्रमाणे प्रदान करण्यात यावी:-

**अ) दि.०१.०५.२०१८ रोजी ज्या न्यायिक अधिकाऱ्यांचे भविष्य निर्वाह निधीचे खाते अस्तित्वात आहे त्यांना ६०% रोख व ४०% रक्कम त्यांच्या भविष्य निर्वाह निधीमध्ये जमा करण्यात यावी.**

**ब) दि.०१.०५.२०१८ रोजी ज्या न्यायिक अधिकाऱ्यांचे भविष्य निर्वाह निधीचे खाते अस्तित्वात नाही अशा न्यायिक अधिकाऱ्यांना थकबाकीची रक्कम रोखीने देण्यात यावी.**

४) सेवानिवृत्तीवेतनधारक न्यायिक अधिकारी व कुटुंब निवृत्तीवेतनधारक यांना देखील कार्यरत न्यायिक अधिकाऱ्यांप्रमाणे दि.०१.०१.२०१६ पासून मूळ वेतनावर अंतरिम वेतनवाढ देण्यात यावी व त्याबाबतची थकबाकी सुध्दा त्यांना दि.३०.०६.२०१८ पर्यंत रोखीने देय राहील. (The interim relief shall be given to the pensioners and family pensioners, on the same basis as given to the serving Judicial Officers, with effect from 01.01.2016 and arrears be paid to them in cash by 30.06.2018 )

५) अंतरिम स्वरुपात वेतननिश्चिती केल्यानंतर आयोगाने वेतननिश्चितीबाबतचा अंतिम अहवाल सादर केल्यानंतर देय रकमा समायोजित करण्यात येतील.

२. यासाठी होणारा खर्च त्या त्या वित्तीय वर्षांच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने व त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र.४१३/व्यय-५, दि.१९.०४.२०१८, अनौपचारिक संदर्भ क्र.११७/२०१८/सेवा-९, दि.२५.०४.२०१८ व अनौपचारिक संदर्भ क्र.१०२/१८/सेवा-४, दि. १०.०५.२०१८ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०१८०६२११६३२२२०९१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Amogh Shyamkant Kaloti

Digitally signed by Amogh Shyamkant Kaloti
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Law and Judiciary Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=1f733daf00a6028414c43d0cc10d82acab3b732c4edd56e818f8a3b355588753, serialNumber=9ebeebf21dc54ceec51e6d5ffc84bb94ca6af89497279007d66e97dc13547037, cn=Amogh Shyamkant Kaloti
Date: 2018.06.21 16:37:40 +05'30'

**(अ.श्या.कलोती)**
**विधि सल्लागार नि-सह सचिव**

**प्रति,**

१. मा.राज्यपालांचे सचिव,
२. मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
३. मा.राज्यमंत्री (विधि व न्याय) यांचे स्वीय सहायक,

४. महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई,
५. महालेखापाल-एक/दोन (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
६. महालेखापाल-एक/दोन (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
७. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
९. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई,
१०. प्रमुख न्यायाधीश, नगर दिवाणी व सत्र न्यायालय, मुंबई,
११. मुख्य महानगर दंडाधिकारी, मुंबई,
१२. प्रमुख न्यायाधीश, सर्व कौटुंबिक न्यायालये,
१३. मुख्य न्यायाधीश, लघुवाद न्यायालय, मुंबई,
१४. सर्व जिल्हा व सत्र न्यायाधीश,
१५.संचालक, न्यायिक अधिकारी प्रशिक्षण संस्था, नागपूर,
१६.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
१७.धर्मादाय आयुक्त, मुंबई,
१८. सर्व मंत्रालयीन विभाग,
१९.विधि व न्याय विभागातील सर्व शाखा व कार्यासने,
२०.विधि व न्याय विभाग/का.७ व २० (आवश्यक त्या कार्यवाहीसाठी)
२१.वित्त विभाग /(व्यय-५/सेवा- ४ व सेवा- ९), मुंबई,
२२.निवड नस्ती/का.३.